“मा. महाअधिवक्ता यांचे कार्यालय” व "सहयोगी महाधिवक्ता यांचे कार्यालय" या दोन कार्यालयातील वाहनांचा आढावा <u>मंजूर करणेबाबत</u>.

# महाराष्ट्र शासन

## विधि व न्याय विभाग

## शासन निर्णय क्र. मअव-११२३/१९९/प्र.क्र.१०/का.८

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २८ फेब्रुवारी, २०२३

<u>वाचा</u> :- १) वित्त विभाग, शासन निर्णय,क्र. वाहन -१०००/प्र.क्र.६५/२००१/विनियम,दि.१० सप्टेंबर, २००१
२) वित्त विभाग, शासन निर्णय,क्र. वाहन -२०१४/प्र.क्र.३६/१४/विनियम,दि.२२ ऑगस्ट,२०१४
३) वित्त विभाग, शासन निर्णय,क्र. वाहन -२०१५/प्र.क्र.३०/२०१५/विनियम,दि.८ जुलै २०१५
४) महाअधिवक्ता यांचे कार्यालय, उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र.मअ/१६८/२०२३, दि.१७ फेब्रुवारी,२०२३
५) सहयोगी महाअधिवक्ता यांचे कार्यालय, उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र.समअ/३३/२०२३, दि.१७ फेब्रुवारी,२०२३

<u>प्रस्तावना :-</u>

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ व २ येथील शासन निर्णयान्वये शासकीय व इतर कार्यालयातील वाहनांच्या वापरासंबंधीचे धोरण निश्चित करण्यात आलेले असून प्रशासकीय विभागाने विभागातील व अधिपत्याखालील कार्यालयातील वाहनांचा आढावा घेण्याचे निर्देश देण्यात आले आहेत. विधि व न्याय विभाग, कार्यासन-८ च्या अधिपत्याखालील १३ सरकारी वकील कार्यालयांपैकी मा. महाअधिवक्ता यांचे कार्यालय व सहयोगी महाधिवक्ता यांचे कार्यालयाकरिता वाहन अनुज्ञेय असून वाहनचालकाची पदे मंजूर आहेत. मा. महाअधिवक्ता यांचे कार्यालय व सहयोगी महाधिवक्ता यांचे कार्यालय या दोन कार्यालयांव्यतिरिक्त इतर कार्यालयांना वाहन मंजूर नाही. मा. महाअधिवक्ता यांचे कार्यालय व सहयोगी महाधिवक्ता यांचे कार्यालय या दोन कार्यालयांच्या कार्यालयप्रमुखांसाठीच्या वाहनांचा आढावा झाल्याचे आढळून येत नसल्याने या कार्यालयांचा वाहन आढावा घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

<u>शासन निर्णय :-</u>

विधि व न्याय विभाग, कार्यासन-८ च्या अधिपत्याखालील मा. महाअधिवक्ता यांचे कार्यालय व सहयोगी महाधिवक्ता यांचे कार्यालय या दोन कार्यालयाकरिता राज्यस्तरीय वाहन आढावा समितीने दिलेल्या मान्यतेनुसार पुढीलप्रमाणे वाहन आढावा मंजूर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | पदनाम | आढाव्यानुसार अनुज्ञेय वाहने |
|---|---|---|---|
| १ | मा. महाअधिवक्ता यांचे कार्यालय, उच्च न्यायालय, मुंबई | मा. महाअधिवक्ता | १ |
| २ | सहयोगी महाअधिवक्ता यांचे कार्यालय, उच्च न्यायालय, मुंबई | सहयोगी महाअधिवक्ता | १ |

२. वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, (भाग २) दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग २,अ.क्र. १९-ब, नियम क्र.६९ (महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम १९६५) मधील तरतूदीनुसार नवीन वाहन खरेदी अथवा निर्लेखित वाहनाच्या ऐवजी नवीन वाहन खरेदीच्या प्रस्तावास राज्यस्तरीय वाहन आढावा समितीची मान्यता घेणे आवश्यक राहील.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ७५ /२०२३/विनियम, दि.२४.०२.२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून, त्याचा संकेतांक क्र. २०२३०२२८१७५०४०५६१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

RAJESH BAJIRAO GHADGE

Digitally signed by RAJESH BAJIRAO GHADGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT,
2.5.4.20=cf72ed51d101be222757ea3b6d64ed5fc5de8f8529121e097e2203b90069afce, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5D6F97DBFEFD0A526C757773EA06AC43B9D1DC7C582C6F4747CD504E990F85FF, cn=RAJESH BAJIRAO GHADGE
Date: 2023.02.28 17:54:45 +05'30'

**( रा. बा. घाडगे )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. महाअधिवक्ता (राज्यमंत्री दर्जा), महाराष्ट्र राज्य, उच्च न्यायालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव (व्यय) तथा अध्यक्ष , राज्यस्तरीय वाहन आढावा समिती, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३. अपर मुख्य सचिव (प्र.सु.व र.व का.) सामान्य प्रशासन विभाग तथा सदस्य , राज्यस्तरीय वाहन आढावा समिती
४. अपर मुख्य सचिव (ले व को) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
५. प्रधान सचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६. प्रधान सचिव व वरिष्ठ विधि सल्लागार, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७. महालेखापाल महाराष्ट्र-१, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
८. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य तथा सदस्य सचिव, राज्यस्तरीय वाहन आढावा समिती, एम.टी.एन.एल.बिल्डींग नं.२,५ वा मजला, फोर्ट,मुंबई
९. सहयोगी महाअधिवक्ता, उच्च न्यायालय, मुंबई
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१२. कक्ष अधिकारी (व्यय-५/विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवडनस्ती/कार्यासन ८.